सन २०२३-२४ या वर्षासाठी दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना (DDU-GKY) अंतर्गत जनजाती क्षेत्र (अनुसूचित जमाती) (TSP) प्रवर्गासाठी प्रशासकीय खर्चासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०२४/प्र.क्र.२७/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ३० मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जे-१७०२५/०१/२०२४ डीडीयुजीकेवाय (६६/सी), दिनांक १५ मार्च, २०२४.
२. मुख्य परिचालन अधिकारी, दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना, खारघर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.डीडीयुजीकेवाय/२०२३/प्र.क्र.६१/ डीडीयुजीकेवाय /कक्ष, दिनांक २० मार्च, २०२४.
३. शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.५०/कार्यासन-६, दिनांक १३ मार्च, २०२४.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.३८/अर्थसंकल्प-३, दिनांक २० मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजनेच्या (DDU-GKY) जनजाती क्षेत्र (अनुसूचित जमाती) (TSP) प्रवर्गासाठी प्रशासकीय निधी म्हणून पहिला हप्ता रु.५,४०,०००/- इतका निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजनेच्या (DDU-GKY) जनजाती क्षेत्र (अनुसूचित जमाती) (TSP) प्रवर्गाकरीता केंद्र हिस्सा (२५०१ २९५३) याकरिता रु.३७,७९,९९,०००/- तसेच केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ २९३५) याकरिता रु.१,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. तथापि, केंद्र समरुप राज्य हिस्सा (२५०१ २९३५) याकरीता रु.१,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत असल्याने उर्वरित रक्कम रु.३,५९,०००/- इतकी तरतूद आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाने पुनर्विनियोजनद्वारे उपलब्ध करुन दिली आहे. त्यानुसार सदर केंद्र हिस्सा रु.५,४०,०००/- व केंद्र हिस्सा समरुप

राज्य हिस्सा रु.३,६०,०००/- असा एकूण रु.९,००,०००/- इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२३-२४ मध्ये दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना (DDU-GKY) जनजाती क्षेत्र (अनुसूचित जमाती) (TSP) प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा (२५०१ २९५३) याकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रु.५,४०,०००/- (रुपये पाच लाख चाळीस हजार फक्त) व केंद्र समरुप राज्य हिस्सा (२५०१ २९३५) याकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रु.३,६०,०००/- (रुपये तीन लाख साठ हजार फक्त) असा एकूण रु.९,००,०००/- (रुपये नऊ लाख फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी आहरित करणेकरीता उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, सी.बी.डी.बेलापूर यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर मुख्य परिचालन अधिकारी, दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.५,४०,०००/- (रुपये पाच लाख चाळीस हजार फक्त) चा खर्च "मागणी क्र.टी-५, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०१, एकात्मीकृत ग्रामविकास कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०६) महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजिविका अभियाना अंतर्गत विशेष कौशल्य विकास प्रकल्पासाठी वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा)(कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२५०१ २९५३)" या लेखाशिर्षाखाली व रु.३,६०,०००/- (रुपये तीन लाख साठ हजार फक्त) चा खर्च "मागणी क्र.टी-५, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०१, एकात्मीकृत ग्रामविकास कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०५) आजीविका अंतर्गत कौशल्य विकासासाठी विशेष प्रकल्पावरील वित्तीय सहाय्य (महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजिविका अभियान) (राज्याचा हिस्सा)(कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२५०१ २९३५)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ मध्ये केलेल्या तरतूदी मधून तसेच

आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाने पुनर्विनियोजनद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. मुख्य परिचालन अधिकारी, दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना, नवी मुंबई यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षानिहाय / उपलेखाशीर्षानिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दीष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, आदिवासी विकास विभाग व ग्राम विकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. मुख्य परिचालन अधिकारी, दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना, नवी मुंबई यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्यक्षेत्रात मात्र वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

७. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

८. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक १२ एप्रिल, २०२३ व ०८ डिसेंबर, २०२३ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.४१६/२०२४/व्यय-१४, दिनांक २७.०३.२०२४ व आदिवासी विकास विभाग अनौ.संदर्भ क्र.२९/२०२४/कार्यासन-६, दिनांक ३०.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. वाचा येथील संदर्भ क्र.४ येथे नमूद वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक २०.०३.२०२४ मधील सूचनांचे तंतोतंत पालन करण्याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३०१४१६०२५८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK ASHOK DAINGADE

Digitally signed by VIVEK ASHOK DAINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=53c2fccec74ddb1c052589e5cbaed9d19ba0d0043df169c83be27faeb8bf045b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=670EB0FA576F65F4406D031E11A90EA6FFB3AEFB253D401F5CED2AD1A6605DBF, cn=VIVEK ASHOK DAINGADE
Date: 2024.03.30 16:58:17 +05'30'

**( विवेक दाईंगडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४) मुख्य परिचालन अधिकारी, दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना, राज्य व्यवस्थापन कक्ष, खारघर, नवी मुंबई.
५) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई.
६) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे.
७) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
८) कक्ष अधिकारी (का.६/का.१७) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

९) वित्त विभाग (व्यय-१४) व ( अर्थ-१९) मंत्रालय, मुंबई-३२.
१०) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
११) निवडनस्ती.